सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या बाबतीत विभागीय चौकशीची प्रकरणे प्राथम्य क्रमाने पूर्ण करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक, सीडीआर-१०९७/१५६/प्र.क्र.१४/९४/अकरा,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २४ फेब्रुवारी १९९७.

परिपत्रक :

लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांनी शासनास सादर केलेल्या २३ व्या वार्षिक अहवालात असे अभिप्राय दिले आहेत की, शासकीय कर्मचाऱ्यांविरुध्दची शिस्तभंग कार्यवाही बऱ्याच प्रकरणात कर्मचाऱ्यांची सेवानिवृत्ती अगदी जवळ आल्यानंतर किंवा कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर बऱ्याच दिवसांनी केली जाते, अशा वेळी कर्मचाऱ्यास केवळ तात्पुरत्या सेवानिवृत्तीवेतना खेरीज इतर आर्थिक लाभ होत नसल्याने त्याचे नुकसान होते. त्यामुळे अशा बाबतीत चौकशी तातडीने पूर्ण होणे व त्यासाठी दोषारोप पत्र बजावणे, चौकशी अधिकारी नेमणे या प्रक्रिया २ महिन्यात पूर्ण होणे आवश्यक आहे, व एकूण चौकशीची कार्यवाही १ वर्षात पूर्ण होणे आवश्यक आहे, असे लोकआयुक्त यांचे अभिप्राय आहेत.

वरील अभिप्राय व शिफारशी यांचा अभ्यास केल्यानंतर शासन अशा निष्कर्षाप्रत आले आहे की, सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांच्या विरुध्दची विभागीय चौकशी प्राथम्यक्रमाने पूर्ण होणे आवश्यक आहे. त्यानुसार शासन असे आदेश देत आहे की, विभागीय चौकशीची प्रकरणे ✱ शक्यतो कर्मचाऱ्यांच्या सेवा-निवृत्तीच्या सुमारास किंवा सेवानिवृत्तीनंतर सुरु करण्याच्या प्रवृत्ती पासून परावृत्त व्हावे व अशा प्रकारच्या चौकशा सेवा निवृत्तीपूर्वी पुरेसा अवधी शिल्लक असतांना सुरु करण्याची दक्षता घ्यावी. तथापि, जर काही विशिष्ट परिस्थितीत ही चौकशी सेवानिवृत्तीच्या वेळी किंवा त्यानंतर सुरु करणे आवश्यक झाले तर अशा वेळी दोषारोप पत्र तातडीने बजावण्यात यावे.

[कृ.मा.प.]

तसेच चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांच्या नेमणुका २ महिन्यात करण्यात याव्यात व विभागीय चौकशीची संपूर्ण कार्यवाही १ वर्षात पूर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी.

सर्व मंत्रालयीन विभागांनी वरील सूचनांचे पालन करण्याची दक्षता घ्यावी. तसेच ह्या सूचना त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणून त्यांना त्यांचे कटाक्षाने पालन करण्यास कळवावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ ज.द.ठाकूर ]
शासनाचे अवर सचिव

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे सचिव
मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा , उच्च न्यायालय, मुंबई
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
* सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

निवड नस्ती.